

# ब्रह्मावतार इमामशाह ज्ञानामृत



संदर्भ – संत समागम

पहिली आवृत्ती – रविवार दि. १४/१२/२००३

लेखक – श्री. गो. ह. करमरकर, पुणे

# ब्रह्मावतार इमामशाह ज्ञानामृत

: प्रकाशक :

आचार्य श्री. जनार्दन महाराज
आचार्य श्री. पुर्णानंद महाराज
श्री सत्पंथ साहित्य प्रकाशन
श्री सत्पंथ मंदीर, फैजपूर (४२५५०३)
ता. यावल जि. जळगाव ☎ (०२५८५) २४५४१७



: संकलन :

आचार्य श्री. जनार्दन महाराज

( किंमत १५० रु. )

: मुद्रक :

विजय ऑफसेट, फैजपूर
ता. यावल, जि. जळगाव ☎ २४५६४२

ॐ नमो निकलंकी नारायण जनार्दनम्

श्वेतघोडो स्वामी पलाणसे प्रभुजी थासे स्वार। त्रिधारू खड्ग हाथे लेसे सर्वे सैन्य लावे साथ।
कुदरतनो घोडो स्वामी भीहसे मोती पुरावसे बालोनाल। हिरा रतन माणक जडसे चितरीयाकस्से पलाण
स्वामी सोवन मंडार भरीया तेनी शुं करावे वखाण। सोळा कळानु तेऊं चांदरणु जेना श्री निकलंकी नाम

– आगमवाणी – सद्गुरु इमामशाह कृत .

कलियुग प्रमाण ४,३२००० वर्षे .
अवतार कार्य ४.३२००० वर्षे.
अथर्ववेद प्राधान्यभूत .
श्री निकलंकी अवतार .

श्वेतघोडा

ध्वजा छत्रधारी हनुमान

श्री निष्कलंकी नारायण (विष्णू भगवंताचा दहावा अवतार)

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

"ब्रह्मावतार इमामशाह ज्ञानामृत" हा ओविबध्द सद्गुरु इमामशाहा संबंधीचा चरित्रग्रंथ वाचकांच्या हाती देतांना मनस्वी खूप खूप आनंद होत आहे.

**सद्गुरु साथे गोठडी कीजे । तो नीत नीत अमी पीवे ॥**

आपण जर नेहमी सद्गुरुंच्या सानिध्यात राहिलो तर आपल्याला नियमितपणे ज्ञानामृत प्यायला मिळत असते. अमृत प्राशन केल्याने आपण दीर्घायू होत असतो. परंतु अश्वत्थाम्यासारखे दीर्घायुष्य काय उपयोगाचे ? म्हणून सद्गुरु सांगतात, की तुम्ही 'ज्ञानामृत' प्राशन करा त्याच्याने तुमच्या जीवनाचे सार्थक होईल तुम्हीं अशा अढळ पदाला जाऊन पोहोचाल की तेथून तुम्हाला कोणीही हलवू शकणार नाही. म्हणजेच या जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून आपली सुटका होईल.

हा नरदेह धर्म संपादन करुन जन्माचे सार्थक करण्याचे मुख्य साधन आहे 'नृदेहमाद्यं खलु धर्मसाधनम्' सर्व जीवप्राणिमात्रांच्या देहापेक्षा मनुष्यदेह अत्यंत उत्तम आहे. हा मानवजन्म ईश्वरी अनुग्रहाशिवाय लाभू शकत नाही. सर्व देहधारी प्राण्यांत आहार, निद्रा, भय व मैथून हे प्राणीज धर्म स्वाभाविक असतात. याशिवाय पाचवी जी सद्सद्विवेक बुध्दि शक्ति आहे, ती मनुष्यात विशेष असते त्यामुळे तो जन्म विशेष होय या मनुष्यजन्मात आपण अनेक सत्कर्मे करु शकतो सत्संगती करु शकतो. सत्विद्या संपादन, ज्ञान, ग्रहण, वाचन व नामस्मरण करु शकतो. या माध्यमातून भगवत्भक्ती करुन परब्रम्ह परमात्म्याचे दर्शन घेऊ शकतो.

मनुष्य हा ज्ञानप्रीय प्राणी आहे. ज्ञान मिळवण्याबरोबरच जर आपण परमेश्वराचे स्मरण केले, ध्यान केले तर आपल्या मनाची सर्व कुलक्षणे गळून पडतील. मनाचे सर्व विकार नाहीसे होतील म्हणून ते ज्ञान मिळवण्याकरिता आपण. सद्गुरु ज्ञानामृत स्थिर चित्ताने श्रवण, पठण केले पाहिजे. आपले मन आतिशय चंचल असते. ते क्षणात सुविचारी असते, तर क्षणात कुविचारी बनते. मन अस्थिर असल्यामुळे ते या मायासागरात निरंतर गोते खात असते. हे मन शांत व स्थिर झाल्याशिवाय या जंजाळातून आपली सुटका होणार नाही. त्याकरिता सद्गुरुंचे नामस्मरण करणे फार गरजेचे आहे.

श्री सद्‌गुरुचे नाममात्र । तेचि आम्हा वेदशास्त्र ॥
सकळ मंत्रा वरिष्ठ मंत्र। नाम सर्वत्र गुरुंचे ॥

या नीत्यपाठातील ओवीप्रमाणे सद्‌गुरुंचे चरित्र श्रवण करणे, सद्‌गुरुंची स्तुती करणे, नामस्मरण करणे हीच सर्वश्रेठ भक्ती आहे. एखादी अळी नेहमी भुंग्याचे स्मरण केल्याने एके दिवशी स्वत:च भुंगा बनत असते, म्हणजेच केवळ स्मरण केल्याने त्या अळीचे रुपांतर भुंग्यात होत असते. त्याच प्रमाणे एखादा भक्त ज्यावेळी सद्‌गुरुंचे अंत:करणापासून स्मरण करतो तेव्हा तोही त्यांच्या स्वरुपात जाऊन मिळत असतो.

'ग्रंथ हेच गुरु' या सुविचाराप्रमाणे ग्रंथ हेच आपले खरे मार्गदर्शक असतात. मनुष्यजन्माचे सार्थक कसे होईल, त्यासाठी जीवन कसे जगले पाहिजे यासबंधीचे ज्ञान आपल्याला संत चरित्रांतून मिळत असते. अशाच प्रकारचा आपल्याला सत्मार्ग दाखविणारा व सद्‌गुरुंचे महत्व पटवून देणारा हा 'ब्रह्मावतार इमामशाह ज्ञानामृत' ग्रंथ आहे. या ग्रंथामुळे आपल्या जीवनाला नक्कीच आध्यात्मिक वळण मिळणार आहे. प्रस्तुत ग्रंथात युगगुरु ब्रह्मावतार श्री इमामशाह महाराजांचे जीवन चरित्र सर्वसामान्य भक्तांना समजेल असेच मांडले आहे. ओवीबध्द स्वरुपात असल्यामुळे पारायणासाठीही या ग्रंथाचा चांगला उपयोग होईल. या ग्रंथात वर्णन केलेले इमामशाहांचे चमत्कार किंवा साक्षात्कार हे त्यांचे महत्व वाढावे यासाठी नसून त्यांनी आध्यात्मिक तपश्चर्येव्दारे ज्या विद्या संपादन केल्या व त्याव्दारे गरीब दुबळ्या जनतेची जी सेवा केली त्याबद्‌लची वस्तुस्थिती त्यात मांडली आहे.

प्रस्तुत ग्रंथ सद्‌गुरुंच्या आशिर्वादाने व इच्छेनेच प्रकाशित होत आहे. 'संतसमागम' हा ग्रंथ प्रकाशित झाल्यानंतर प.पू. जगन्नाथ महाराजांनी सर्व मराठी साहित्य प्रकाशन संस्थांना त्याच्या प्रती परीक्षणासाठी पाठविल्या होत्या त्याचबरोबर 'संतकृपा' प्रकाशन पुणे यांनाही त्याची एक प्रत पाठवली. 'संतकृपा झाली इमारत फळा आली' या ओवीप्रमाणेच प्रस्तुत ग्रंथाचा पाया रचला गेला. संतकृपाचे संपादक श्री काकतकर यांनी 'संत समागम' हा ग्रंथ परीक्षणासाठी बऱ्याच लेखकांकडे दिला परंतु सर्वांनीच त्यासाठी नकार दिला कारण या ग्रंथाबद्दल, पंथाबद्दल कोणाला काहीच माहिती नव्हती. शेवटी त्यांनी श्री. करमरकरांना याविषयी सांगितले व तुम्हालाच हे करावे लागेल असे सांगितले तेव्हां करमरकरांनी सुध्दा लगेच होकार दिला. भगवंतावर ज्याची दृढ श्रद्धा असते तो कितीही कठीण काम असेल तरी ते अगदी सहजपणे करु शकतो. श्री. करमरकरांनी 'संतसमागमाचा' पूर्ण अभ्यास करुन २० ते २५ पानांचे परीक्षण तयार केले परीक्षण संतकृपाचे संपादक श्री. काकतकर यांनी संतकृपातून प्रसिध्द केले संतकृपातील ते परीक्षण वाचल्यावर बऱ्याच वाचकांची

पत्रे संतकृपाला, करमकरांना व सत्पंथ मंदीर फैजपूराला आली संतकृपातील त्या परीक्षणाला भरघोस प्रतिसाद लाभला. 'आम्हाला माहीत नसलेल्या एका प्रभावी संताचे चरित्र आज माहित झाले' असे म्हणून सर्वांनी करमकरांचे अभिनंदन केले प.पू. जगन्नाथ महाराजांनी काकतकरांचे व करमरकरांचे अभिनंदन केले.

काही दिवस गेल्यानंतर श्री. करमरकरांचे प.पू. जगन्नानाथ महाराजांना पत्र आले. पत्रात लिहिले होते, "मला अशी प्रेरणा झाली आहे की श्री. इमामशाहांचे ओवीबध्द चरित्र लिहावे परंतु तसे लिखाण किंवा त्यांचे ओवीबध्द चरित्र तयार असेल तर मी लिहीत नाही. नसल्यास तसे कळवा. मी सेवेस तयार आहे." त्यावर महाराजांनी त्यांना कळविले की त्यांचे ओवीबध्द चरित्र तयार नाही व तसे चरित्र असावे अशी माझी सुध्दा इच्छा आहे आणि म्हणूनच तुम्हाला तशी प्रेरणा झाली आहे. तुम्ही लिहिण्यास हरकत नाही. अशाप्रकारे करमरकरांनी हे ओवीबध्द चरित्र लिहायला सुरुवात केली. भगवंतानेच त्यांच्या हातून हे संपूर्ण चरित्र लिहून घेतले.

अशाप्रकारे 'ब्रह्मावतार इमामशाह ज्ञनामृत' हा ग्रंथ लिहून तयार झाला या ग्रंथात इमामशाहांचे पूर्ण चरित्र अतिशय चांगल्या प्रकारे मांडले आहे. एकूण चौऱ्यात्तर दिवसांत साठ अध्यायात त्यांनी चार हजार चारशे एकोणचाळीस ओव्या तयार केल्या. प्रत्येक अध्यायाचे विशेष महत्व त्यांनी वर्णन केले आहे. याबद्ल विस्तृत माहिती साठाव्या अध्यायात सांगितली आहे.

मा. श्री. गो. ह. करमरकर यांनी या ग्रंथासाठी खूप मेहनत घेतली आहे. स्वास्थ्य ठीक नसतांनाही त्यांनी चिकाटीने हे कार्य पूर्ण केले, त्याबद्ल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. ग्रंथ प्रकाशित करण्यासाठी ज्या भाविकांनी आर्थिक मदत केली त्यांचेही आभारी आहोत. तसेच फैजपूर येथील उत्कृष्ठ छपाईसाठी प्रसिध्द असलेले 'विजय ऑफसेट' व मालक श्री. विजयसिंह परदेशी यांनी अतीशय कमी वेळात कमी दरात छपाई करुन दिली त्याबद्दल त्यांचेही हार्दिक आभार. श्री. संजय कुलकर्णी यांनी या ग्रंथाची अक्षर जुळणी करुन कुठेही चूक राहू नये यासाठी खूप मेहनत घेतली तसेच ग्रंथाचे मुखपृष्ठ व आतील फोटोंचे डीझाईन श्री. यागेश परदेशी यांनी करुन दिली. त्याबद्दल त्यांचेही हार्दिक आभार व हा ग्रंथ उत्कृष्ट व्हावा यासाठी ज्या नामिक अनामिक भाविकांचे मार्गदर्शन आम्हाला लाभले त्या सर्वांचे आम्ही खूप आभारी आहेत.

धन्यवाद !

प्रकाशक
सत्पंथ साहित्य प्रकाशन, फैजपूर

# ग्रंथ कर्त्याचें निवेदन

भगवान श्री दत्तात्रेय कृपेनें ॥ श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृत ॥ हा ग्रंथ मला प्राप्त झाला असून हा संपूर्ण ग्रंथ प्रासादिक असून पठण करणाऱ्याचे, इह परत्र कल्याण व कामनापूर्ती श्री युगगुरु इमामशाह महाराज नक्की करतील, या ग्रंथास त्यांचे पूर्ण आशीर्वाद आहेत.

दि. ५/८/२००१ रोजी दुपारी दहा पंधरा मिनीटे भावसमाधी लागली. त्यांत श्री इमामशाहांचे दर्शन होऊन, त्यांना साष्टांग नमस्कार घातला असतां त्यांनी माझे पाठीवर हात फिरवून, हा ग्रंथ माझाच आहे. "उत्तम" असें म्हणून आशीर्वाद दिला. हे मी श्रीगुरुशपथ पूर्वक लिहीत आहे. याचे समग्र वर्णन अध्याय साठ मध्यें ओवीक्रमांक दोनशें बत्तीस ते दोनशें त्रेचाळीस पर्यंत लिहीले आहे. सांगावयाचें तात्पर्य इतकेच की, या ग्रंथास श्रीयुगगुरु ब्रह्मादत्त श्री इमामशाह महाराजांचा पूर्ण आशीर्वाद आहे. तरी भक्तांनी हा ग्रंथ पठणांत ठेऊन आपले कल्याण करून घ्यावे.

ग्रंथ कर्त्यास, ग्रंथास नियम घालावयाचा अधिकार असतो. परंतु सद्यकालाचा विचार करून कोणताही नियम घातला नाही.

!! अंत:करण असतां पवित्र, सदा वाचावे ज्ञानामृत ॥

पुणे ४११००२ दि. ८/८/२००१

## ★ सप्ताह पारायण पध्दत ★

आपले नित्यकर्म करून शुभ दिवस अथवा स्वत:चे जन्मनक्षत्रावर सप्ताह / पारायणास सुरुवात करावी, विशेषत: शुध्द एकादशी पासून सप्ताह करावा. सप्ताह समाप्ती आपल्या शक्तीनुसार करावी. सप्ताह पूर्णतेची दक्षिणा, श्रीगुरुमहाराजांचे प्रित्यर्थ सत्पंथ मंदीर, ( पंचम धाम ) संस्थान, फैजपूर यांचेकडे आपल्या शक्तीनुसार पाठवून, सप्ताह दक्षिणा असे कळवावे.

सप्ताह पध्दत - पहिला दिवस - अध्याय १ ते ९, दुसरा दिवस - १० ते १८, तिसरा दिवस - १९ ते २९, चवथा दिवस - ३० ते ३९, पाचवा दिवस - ४० ते ५०, सहावा दिवस - ५१ ते ५७, सातवा दिवस - ५८ ते ५९, आठवा दिवस - ६० व पुन्हा अध्याय ३ वाचावा.

पारायण पध्दत - पहिला दिवस अध्याय १ ते १९, दुसरा दिवस २० ते ४३, तिसरा दिवस ४३ ते ५९, चौथा दिवस ६० व पुन्हा अध्याय ३ वाचावा.

गुरुपुष्य, रविपुष्य, गुरुपौर्णिमा, गुरुप्रतीपदा, दत्तजयंती वा चैत्र शुध्द द्वितीया व वाटेल त्या दिवशीं एक दिवसाचें पारायण करावे.

ज्याचे कामनिक अनुष्ठान असेल त्यांनी प्रथम सप्ताह करून, कामनिक अध्याय रोज तीन वेळा वाचावा.

# अध्याय १ ला

ॐ श्री दत्तात्रेयाय नमः॥ श्रीगुरवे नमः॥ श्री सरस्वत्यै नमः॥ श्री वरदमुर्तये नमः॥१॥ ॐ नमो जी आद्यपुरुषा। वेद प्रकटले तव श्वासा सर्वात्मका श्री सर्वेशा॥ आत्मरुपा वंदिले॥२॥ नमो श्वेतार्क गणपती॥ चौदा विद्यांचा अधिपती। प्रथम तुम्हां वंदिती। नसे विघ्न तयांसी॥३॥ हरावया विघ्नांस। धरला करी फरश॥ ग्रंथ विनासायास। पूर्ण होवो दातारा॥४॥ तुम्हां म्हणती वरदमूर्ती। वरद द्यावा ग्रंथी॥ रुपक ऊपमा अलंकारादी। यमका द्यावे अवधान॥५॥ नमो विद्या सरस्वती। परावाणीची अधिष्ठात्री॥ स्फुरण प्रेरणा दीप्ती। तीचे कृपे प्रकाशे॥६॥ श्वेत वस्त्र प्रावरण। श्वेत मौक्तीक आभुषणें॥ श्वेत चंदने भाळ लेपन। शोभे टीळा केशराचा॥७॥ वीणेच्या स्पंदन मात्रे। ऊठती तरंग अनाहते॥ शब्द सुमन पारीजाते। साकारती पंक्तीमाला॥८॥ विचारांचे पुढे। पडती सारस्वत सडे॥ लेखणी आतुडे। प्रकट करण्या पत्री॥९॥ म्हणून म्हणती विश्वमोहीनी। शब्दार्थ विविध दाऊनी॥ देवता, जनांसी मोहवुनी। भ्रम विजनी भ्रमवितसे॥१०॥ आता नमू ब्रह्मदेवासी। करी धरी अमृत कलशासी। सृजी अनुक्रमें सर्वांसी। योनी लक्ष चौऱ्यांशी॥११॥ चारी वेदांची स्मरणीका। जपत राहे सर्वदा। हंस वाहिनी असे देखा। ऊत्पल अष्टोत्तर शतपत्री॥१२॥ नमन माझे शेषशायना। लक्ष्मीकांत नारायणा॥ क्षीरसागरी अनंतासना। दृष्टी असे नासाग्री॥१३॥

शुध्द नभ वर्ण कांती। अष्ट करी आयुधे असती॥ सु-दर्शने सर्वांप्रती। सुदर्शन करी असे॥१४॥ नमन माझे महेश्वरा। कैलास नाथ गौरीवरा॥ त्रिशुल विलसे करा। डमरु ध्वनी ॐकार॥१५॥ कर्पूरा सम वर्ण। रुद्राक्ष नाग आभरण॥ श्वेत भस्म विलेपन। ऊटी लाविली चंदनाची॥१६॥ समस्तांचे करी कल्याण। म्हणुनी शिव अभिधान॥ अल्पसेवें कामना पूर्ण। म्हणुन म्हणती आशुतोष॥१७॥ नमो नमः कुलस्वामिनी। अंबा आरोग्यभवानी॥ योगेश्वरी अंबेवासिनी। प्रतीरुप श्री रेणुका॥१८॥ सप्तश्रृंगाची चंडीका। वंदीली अष्टादशभुजा देखा। श्री मार्कण्डेय वरदायीका। शांभव मंत्र प्रदायीनी॥१९॥ सुदर्शन चक्रावर। वसले क्षेत्र मातापूर॥ श्री रेणूका सरस्वती रुप। प्रसादायीनी वंदिली॥२०॥ पुरी कडगंची, सोळाग्राम। मधे आमुचे गुरुस्थान॥ श्रीनृसिंह सरस्वती सगुण। निर्गुण पादुका रुपें बसले॥२१॥ तयांचे रुप श्रीस्वामी समर्थ। प्रत्यक्ष वास अक्कलकोट॥ श्री शंकररूपें कृपावरद। पूर्वावतार कुंवरस्वामी॥२२॥ साक्षातरुप ऊमापती। रावेर वाघोडी वास करीती॥ वंदुनी तयाप्रती॥ आशिर्वचन मागतसे॥२३॥ अवधुत सांप्रदाय, माहूर मठ। शक्ती रेणूका श्रीदत्त दैवत॥ शक्ती उपासना बीजोक्त। श्रीकृपे लाभली॥२४॥ आता नमीले कविकुळासी। वाल्मीकादी व्यासांसी॥ पारमार्थिक ग्रंथकर्त्यांसी। नमन माझे सर्वदा॥२५॥ नेणे कवित्व कैसे। परी लिहीतो श्रीगुरु भरवंसे॥ मशक मेरू लंघितसे। श्रीसद्गुरु आधारे॥२६॥ नाही

संदेह नाहीं चिंता। भार श्रीगुरुवरी सर्वथा।। श्रीगुरुभक्ती लाऊनी कसा। चरित्रारंभ आरंभीला।।२७।। आहे गृहस्थ परी सन्यासी। दंड छाटी श्री प्रसादेसी।। भोगीतो अवधुत अवस्था परमहंसी। एक देही अवस्था त्रय।।२८।। श्री निष्कलंकी नारायणा। भगवान श्री जनार्दना।। भस्मायुधें करी छेदना। भक्तजनांच्या दुःखासी।।२९।। दीव्यनेत्रे प्रज्ञा प्रकाशविसी। आत्मज्ञान भक्तांसी।। तव कृपा अविनाशी।। अवतार होण्यापूर्वी वंदन।।३०।। नमो श्रीब्रह्मावतारा। सांभाळी स्वचरित्र धुरा।। लेखन समर्यी ऋतुंभरा। अविष्कार वांछीतसे।।३१।। ब्रह्मदेवाचा अवतार। प्रकटला भूवर।। करणें दीनोध्दार। नाम श्री इमामशाह।।३२।।। म्हणतील चिकीत्सक। पीराचे हे असे चरित्र।। नसावा संदेह मनांत। ब्रह्मावतार प्रत्यक्ष असे।।३३।। तयांसी म्हणती जे मोमीन। ते कळीचे इष्टपूर्ण।। जरी दृष्टीस येई जनार्दन। तरी तया अव्हेरती।।३४।। क्षेत्र कुंवारीका म्हणून। असे जयांचे मूळ स्थान। भागीरथी स्वयें अवतरून। द्वारी स्थिरावली।।३५।। नजीक सरीता साबरमती। जल वाहे साबर मंत्री।। अती सगुण भक्ती। गुर्जर देशी होतसे।।३६।। दक्षिण देशी साधुस अन्न ना मिळे खावयास।। उत्तरदेशी तयास। अजीर्ण अपचन होतसे।।३७।। श्रीइमामशहांचे चरित्र। असे परम पवित्र।। श्रवण पठण मात्रें। दोष हरती श्री गुरुकृपे।।३८।। पठण मात्रें सर्वदा। जाती व्याधी आपदा।। लक्ष्मीचे चंचलत्व। स्थिरता होयील।।३९।। चरित्र नोहे ज्ञानपथ। ब्रह्मा नारायण प्रकाशक। ज्ञानगंगेत सुस्नात। होवोत भक्त जन।।४०।। ब्रह्मज्ञानाचा रस। श्रीगुरु प्राशवित।। मृत्युलोकीं अमरत्व। पावतील श्रोतेजन।।४१।। इति श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृते।। श्री मंगलाचरण नाम प्रथमोध्याय: ।।४२।।

श्री गुरुदेवार्पणमस्तु।। शुभं भवतु।।

# अध्याय २ रा

ॐ श्री परमात्मने नमः ।। श्री दत्तात्रेयाय नमः ।। श्री सरस्वत्यै नमः । श्री निष्कलंकी नारायणाय नमः । श्री इमामशाहा चरित्र । क्रमतसे स्मृती पथ ।। अनंत अपार चरीत्र । वर्णू शकेल कोण ।।२।। नारायणे वामन अवतारात । बळीस मागे दान भूमी त्रिपाद । तंव वामने एका पादात । ब्रह्मांड व्यापीले ।।३।। ब्रह्मा पहावा विष्णूपद । कलश उदके प्रक्षाळीत ।। तो जलोद्भव अवनीवर । अवतरे सत्यलोक धारा ।।४।। ती स्वर्गंगा ब्रह्मगिरीवरी । नाम पावली गोदावरी ।। कुशावर्ती त्र्यंबकेश्वरी । गौतमी पुण्यपावनी वसे ।।५।। कृत लक्ष द्वयातीते, मांधातावरी शके सती । कुर्मे अवतारेच, सिंह स्थिते ब्रहस्पतौ ।।६।। माघमासे सीव पक्षे, दशम्यां सौम्यवासरे । माध्यान्हे तु समायाता, गौतमी पुण्यपावनी ।।७।। गौतमीचे जल । ते सत्यलोकीचे केवळ ।। जाणा अती पवित्र । अमृत ब्रह्मा करोद्भवा ।।८।। ब्रह्मा करीचे जल । विष्णू पदी होय तीर्थ ।। म्हणून वंदीली अत्र । गौतमी गंगा गोदावरी ।।९।। महेशाचे जटेतून । गंगा येतसे स्त्रवून ।। साक्ष घ्यावी अवलोकून । क्षेत्र श्रीत्र्यंबकेश्वरीं ।।१०।। अत्याचारी अनाचारी । पाखण्डी दुराचारी ।। वेद निंदक, अघोरी । वर्तती जन तमोगुणे ।।११।। तेव्हा नियतीचा तोल ढळे । तांडव नृत्या शिव आकळे महापूर, अघोर वादळे । धरा होत कंपायमान ।।१२।। ऊठे सर्वत्र कल्लोळ । सूर्य चंद्रा पडे खळ ।। धुलीका लोटे अंबर । ग्रासे चंद्रादीत्त्या ।।१३।।

महा प्रलय काली। ब्रह्मा मस्तक घेऊनी करी।। तांडवी अनुसरे महाकाली।। प्राशन करी रक्ताचे।।१४।। तेव्हां श्री गजानन। होयी षड्भुज कृष्णवर्ण।। खदीरांग वर्ण नयन। नृत्त्या वर्ते शिवात्मज।।१५।। ऊल्कापात होती अती। ग्रह नक्षत्रे शिला होती। पतन त्यांचे धरेवरती। मावळती तारांगणे।।१६।। बारा आदीत्य तप्त होती। धरा फुटे जैसी चुनखडी। सप्त सागर ऊकळती। होतसे महावर्षा।।१७।। पृथ्वी पावे लय जलांत। जललय तेजात।। तेज सामावें वायुत। वायु लय आकार्शी।।१८।। आकाश लय ब्रह्मात। ब्रह्ममय सर्वत्र।। तेव्हां निर्गुण मायेच्या तमात। रक्षीयेली जीवदशा।।१९।। जीवां सवे कर्मगती। राहे तमी असूर्याप्रती।। ब्रह्ममय शांती। अचरी भरून राहे।।२०।। आदीनारायण, आद्यशक्ती। निर्गुणरुपे वसती। ती ब्रह्ममय ब्राह्मी स्थिती। अगणित काल राहे।।२१।। ब्रह्मांत होता स्पंदन। आदीशक्ती पावे स्फूरण।। अंतर कुंभक त्यजून। ऊच्छास तीने टाकीला।।२२।। तो ऊच्छावसा स्पंदन। विभाग झाले साडेतीन।। ध्वनी प्रकटला ॐ।। तो वाचक आद्याचा।।२३।। निराकार होण्या साकार। लागे शक्तीचा आधार।। श्रृती स्मृती संमत। शक्तीक्रीडा जगत् सर्वम्।।२४।। तीने सत्वगुणें संकल्पून। केले आदीपुरूषा साकारण तोची श्री आदीनारायण। वास करी क्षीराब्धीत।।२५।। मग तमोगुण संकल्प मात्रे। नीर्मी महेश्वराते।। ब्राह्मी स्थिती भोगते। राहती देवद्वय।।२६।। क्षीराब्धी शेषशयना। अनंतासनी नारायण।। मूळ स्थितीते असता मग्न। स्फूरण पावे

परा ।।२७।। स्फूरणाचे ऊर्ध्वगती। अनंत वेद प्रकटती ।। तयांचे सारांशे प्रती। विभागे नीर्मी वेद चार ।।२८।। सकारे भरता शीवस्थिती। हकारे गदगदे पूरमणी ।। तंव नारायणाचे नाभीतूनी। कमलोद्भव षट्पत्री ।।२९।। हंस स्थितीवरी। कमलप्रभाव त्यांत प्रकटे ब्रह्मदेव ।। चार दीशा अवलोकीता। चतुर्मुख होतसे ।।३०।। नारायण आज्ञावी तयासी। सृजन करावे सृष्टीसी आद्यशक्ती सहाय्य तुजसी। दीधले प्रमाणा चतुर्वेद ।।३१।। ब्रह्मदेवाचे ईच्छेने। झाले सुवर्ण अंड निर्माण। तया करीता अवलोकन। द्वीभाग झाले तयाचे।।३२।। एक भाग ऊर्ध्वगती। तया आकाश म्हणती ।। शेष दुजा वर्ते अधोगती। नाम पावे वसुंधरा ।।३३।। ब्रह्म्याचे भृकुटीतून। विष्णू शंकर निर्माण। तंव हूंकारे माया चैतन्य। अहं ब्रह्मास्मि ।।३४।। चार खाणी, चार वाणी। ब्रह्मा सृजी अनेकमुनी ।। आदिशक्तीच्या तमातुनी। वर्ते जीवसृष्टी धरेवरी ।।३५।। अंतराळी देवता सृष्टी। जे अंशभुत नारायणाचे जीव घेऊनी प्रारब्ध। भूमीवरी प्रवर्तले ।।३६।। सप्त पाताळ, स्वर्ग सप्त। सप्त द्वीप, सागर सप्त ।। चतुर्दश भुवने ख्यात। निर्मिली ब्रह्मयनि ।।३७।। चार वाणी समस्तास। विभागुनी दील्या योनीस ।। तया अनुक्रमेस। निवेदी येथ ।।३८।। परमेशाची परावाणी। देवतांसी मध्यमा म्हणोनी ।। वैखरी मानवा कारणी। सिध्दांचे ठायी पश्यंती ।।३९।। युगे निर्मीली चार। कृत, त्रेत, द्वापार ।। कली तमोगुणी प्रबळ। अधम युग जाणावे ।।४०।। प्रत्येक युगाचा धर्म। युगासी देवताधिष्ठान ।। ऊपासनेचे मर्म। युगानुरुप असे ।।४१।।

तसे गुणांचे प्राबल्य। युगानुरुप केवळ।। देवता देहारंभक। संचितानुरुप जीवांसी।।४२।। प्रथम युग कृतासी। देवता आदीशक्ती।। ऊपासना धर्म आत्मोपास्ती। सत्वगुणें देवत्व मानवा।।४३।। अस्थिगत होता प्राण। तया दावीतो प्रमाण।। इंद्राने घेतल्या मागुन। अस्थि दधीचींच्या।।४४।। ब्रह्मा, विष्णू, महेश। देवता अधिष्ठान त्रेतास।। भक्ती धर्म विशेष। रजोगुणाचे प्राबल्य।।४५।। मांस सडता जाई प्राण। माहूश होता आगमन।। जमदग्नींचे प्राण। मेदमांसी राहीले तैसेच।।४६।। आतां युग द्वापार। इंद्र, चंद्र, सूर्य, देवताधिष्ठीत।। ऊपासना यज्ञयाग। रज-तम मी गुण मानवा।।४७।। रक्त वाहता जाई प्राण। अठरा अक्षौहीर्णींचे हनन।। कुरुक्षेत्रासी मालीन्य। पाट वाहले रक्ताचे।।४८।। कलीयुगा कारणी। अधिष्ठाती देवता यक्षीणी।। श्रीगुरु सेवा करूनी। श्रीगुरुकृपा साधिजे।।४९।। अती प्रबल तमोगुण। अन्नगत राहे प्राण।। जे करावे दान। तेच लाभे तयासी।।५०।। न मीळे अन्न। कासावीस होती प्राण।। पशु, पक्षी मानवा कारण। अनुभव असे प्रत्यक्ष।।५१।। जया न लाभ श्रीगुरुचरणा। तये करावे नामस्मरण।। वा विष्णूसहस्त्रनाम। मध्यम स्वरें म्हणावे।।५२।। रत असावे नामस्मरणी। सत्वगुण लक्षुनी।। अतत्वार्थी मौन। संपदावे सर्वदा।।५३।। पुजा करावी सगुण। इष्ट देवतां अर्चन।। अर्चकाचे तपाने। प्रकटे मूर्तीत देवकला।।५४।। सृष्टी प्रलय, सृष्टी सृजन। युगदेवता धर्म लक्षण। प्राणाचे युग वर्तन। यथामती वर्णीले।।५५।। इति श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृते।। ब्रह्मदेव प्रकटणं नाम।। द्वितीयोध्याय: ।।५६।।

श्री गुरुदेवार्पणमस्तु।। शुभं भवतु।।

# अध्याय ३ रा

ॐ श्री परमात्मने नमः ।। श्री दत्तात्रेयाय नमः ।। श्री सरस्वत्यै नमः ।। श्री निष्कलंकी नारायणाय नमः ।।१।। ब्रह्मदेवे कलशातून। सृष्टी केली निर्माण ।। अनंत वेद रचना। श्री नारायणे केली असे ।।२।। श्री शंकर कैलासनाथ। कला निर्मिल्या चौसष्ट। श्री विष्णू करी प्रकट। चौदा विद्यांसी ।।३।। स्वयं श्री ब्रह्मदेव। निर्माण करी ऊपनिषदे ।। श्रृती स्मृती मंत्रशास्त्रे। स्फुरली ऋषिंसी ।।४।। अनादी हिंदु संस्कृती। ती स्वयंभु निश्चिती ।। तियेची निर्मिती। मानवे केली नसे ।।५।। अक्षर, वरेण्य। धूत पाप कलष्मा, तत्त्वमसी ।। अवधूत नामासी। आद्याक्षरे अर्थ पहावा ।।६।। चंद्रवंश, सूर्यवंश। पूर्वी ऐसे दोन होत ।। निर्मिती सांप्रदाय पंथ। ईश प्रेषित म्हणुनी ।।७।। जे केले निर्माण। तयाचा लय निश्चित जाण ।। केवळ सत् स्वयंभू म्हणून। नाश नसे कल्पांती ।। कलीयुग प्रवर्ते धरणी। काळ वेळ संगे घेऊनी ।। शब्द स्पर्शाचेनी। बाधा त्याची होतसे ।।९।। पिशाच्च्या सारखे वदन। देह दुर्गंधयुक्त पूर्ण ।। अती तामस कृष्ण वर्ण। कुबुध्दीचा कळस ।।१०।। कली पूर्व आगमनी। श्रीकृष्ण गेले स्वधामी ।। राज्य कर्तव्य कामनी। राहे युधिष्ठीर दोन दिवस ।।११।। कलीयुगाचा वारा। दुर्गंध भरे चराचरा ।। विष्ठे वेष्टीले गीरीकंदरा। रक्ते भरली जलकुंडे ।। ऐसे विपरीत पाहून। वर्ते केदार लक्षुन ।। दीसे मार्गी दुर्योधन। नरककुंडी पाहीला ।।१३।। कलीची सर्वत्र स्थाने। परी

विशेष तीन।। वेश्यागृह, द्युतक्रीडन। तीसरे जेथे मद्यपान।।१४।। तीन्हीं स्थाने एकवटून। चवथे अतीहीन।। जेथे असे सुवर्ण।। कली तेथ अतीक्रोधी।।१५।। सुवर्ण तेथे चिंता। अतीव अहंकारता।। सदा असे बुध्दीभ्रष्ट। दर्प भरे नेत्रांत।।१६।। जरासंधाचा मुकुट। शिरी धरी परिक्षीत।। तयाची होऊन बुध्दी भ्रष्ट। मृतसर्प घाली मुनीकंठा।।१७।। त्याचे कर्म आले फळास। ऋषीशापे तक्षक दंश।। शुकदेव देती मुक्तीस। भागवत ऐकवोनी।।१८।। पितृमरण प्रतीशोध। जनमेजये आरंभीले सर्पसत्र।। सर्पकुळांचे सूचिपत्र। संपादीले ऋषींनी।।१९।। कलीस अती आनंद। नृपास भरला क्रोध।। सूड भरला बुध्दीत। अवलोकी आकाशी।।२०।। ऋषीमेळा मंत्रवत। विशाल यज्ञकुंड।। समग्र सामुग्री सिध्द। समिधा योजील्या सर्पांच्या।।२१।। जयाचे नाम ऊच्चारीत। सर्प फेणी पडे अग्नीत।। हाहा:कार सर्वत्र। मंत्र बंधन देवतांसी।।२२।। जगत् सर्व देवाधिन। परी देवता मंत्राधिन।। मंत्र असती ब्राह्मणाधिन। वंदी विष्णू विप्रांसी।।२३।। जाणून आपुले मातुलकुळ। यागस्थानी ये आस्तिक।। क्षणीं थांबवी सर्पसत्र। भयमुक्त केले पन्नगा।।२४।। आस्तिकाचे जाणून ऋण। आस्तिक मंत्र जपे कोण।। तयाचे होता दर्शन। सर्प जाती दूर।।२५।। म्हणून निशा समयास। करणे एकादश आवृत्तीस।। सर्पभय नसे त्यास। सर्पा येई निर्विषता।।२६।। कळीच्या स्पर्शात। कैसी बुध्दी भ्रष्ट होत।। तयाचा संकेत। यथामती निवेदीला।।२७।। आला कलीचा पर्वकाळ। नाना मतांचे बंबाळ।।

पंथ सांप्रदाय कल्लोळ। प्रेषित धर्म संपादीती।।२८।। हिंदु संस्कृती ऊच्छेदन। तयांचे एकच वर्म।। वैदीक मत खंडन। मंडन करीती स्वधर्मांचे।।२९।। स्वमते सांप्रदाय निर्मून। तयास म्हणती धर्म।। तयाचे करणे वर्धन। ऐसा हेत तयांचा।।३०।। काही काल ऐसा वर्तत। संगरे झाली अमूप।। जीव हींसा अशनीपात। कारण कामिनी कांचन।। पूर्वी भरत खंडात। जन वर्तती सात्विक।। अग्नीपूजा संकेत। सहयज्ञ करीती।।३२।। यज्ञधुमाचे कारणी। शुध्द होत वातावरण।। समृध्द असती जन। व्याधी व्यथा नसे।।३३।। सिध्द करूनी मंत्र। ईच्छीत करीती प्राप्त।। स्वये येऊनी तिष्टत। दैवते त्यांचे द्वारी।।३४।। यज्ञे पडे पर्जन्य। पर्जन्ये ऊद्‌भवे अन्न।। इह दिवशी ऋषी गौतम। भात शेती पिकविती।।३५।। सहयज्ञी संस्कृती। तयांसी ब्राह्मण म्हणती।। अविरत तयांची दृष्टी। ब्रह्मावर असे।।३६।। ब्रह्मावरी जयांची चर्या। ब्रह्मचारी म्हणती तया।। आचार ब्रह्मोक्त सहाय्या। अविवाहीत ब्रह्मचारी नोहे।।३७।। कल्पवृक्ष, कामधेनु ब्रह्मास्त्र। चिंतामणी आणि अमृत।। ब्रह्मचर्य, पातिव्रत्य। कली सप्त वर्जीतसे।।३८।। संजिवनी, वनस्पती आणि मंत्र। कलीत होती सिध्द।। गोरक्ष जपता मंत्र। मृण्मय मुर्तीत प्राण संचरे।।३९।। तेच श्री गहीनीनाथ। निवृत्तीनाथा अनुग्रहीत।। ज्ञानेश्वर त्यांचे शिष्य। भावार्थ दिपिका निर्मिली।।४०।। पैगंबर नामे प्रेषित। ईस्लाम धर्म स्थापित।। ईशपुत्र म्हणूनी स्वत:स। ईसाई धर्म ऊच्च म्हणती।।४१।। ईस्लाम शब्दाचा

अर्थ। शांति ऐसा संभवत॥ दया करणे सर्वांप्रत। ईशपुत्र येशु उपदेशी॥४२॥ मूळ अर्थ विसरून। खलीफा करीती धर्मवर्धन॥ वैदीकांसी बाटवून। धर्मांतर करविती॥४३॥ नकार देती तयांस। करीती शस्त्रे घात॥ होऊनी क्रोधी कोपिष्ट। छळती हिंदुंसी॥४४॥ अंगी संचरे भूत। तयापरी वर्तती नष्ट॥ धनाची करूनी लुट। भ्रष्ट करीती स्त्रीयांसी॥४५॥ हिंदूंची मंदीरे मूर्ती। मदीरे नशे भग्न करीती॥ परदुःखे आनंदती। संतोषी खल छल॥४६॥ ईसायी धर्मगुरु पोप। धन देऊनी हिंदुस॥ मृदु शब्दे करूनी ऊपदेश। स्वधर्मा आकळविती॥४७॥ खलीफा, पोपांच्या कृती। वरूनी जरी भीन्न असती॥ स्वधर्म वर्धन वृत्ती। कृती दोन अर्थ एक॥४८॥ शालीवाहन शक। बाराशें ते शत पंचदश॥ धर्मक्रांतीची लाट। हिंदु म्हणती त्राही त्राही॥४९॥ कांही ईस्लाम नृप। हिंदुस म्हणती मित्र॥ दान दक्षिणा अमूप। स्वधर्मे वर्ता म्हणती॥५०॥ धन दान लाभे। ब्राह्मण वृत्ती लोभे॥ याचकवृत्ती मोहे। लाज नसे लोचटा॥५१॥ म्हणती नोहे हा नृप। ईश्वर अवतरला देख॥ ठीगळे लाऊनी ऊपनिषदास। अल्ला ऊपनिषद लिहीले॥५२॥ अल्लाह् हिरण्यगर्भा। अल्लाह् द्वादश मित्राः॥ अल्लाह् रूद्रैकादशः। वरेण्य इति अल्लाह्॥५३॥ ऐसे विकृत बिभत्स। गाऊनी करूनी विशेष॥ म्लेंच्छ नृप होवोनी खूष। धन देत भ्रष्टांसी॥५४॥ क्षत्रिंया वधोनी। केली निःक्षत्र मेदीनी॥ ब्राह्मणां दान करोनी। परशुराम गेले महेंद्र पर्वती॥५५॥ दान घेण्या ते स्थान।

महेंद्रादी गेले ब्राह्मण।। अती लोभी दरिद्री जाणा। कांक्षा न सुटे धनाची।।५६।। धर्मांधासी कंटाळून। सहयज्ञी सोडीती स्थान।। जरी झाले धर्मांतरण। अंतरी वसे मूळ संस्कृती।।५७।। राहूने चंद्रास पिडीले। तरी शुभ्रत्व नाहीं नष्ट झाले।। औषासन अंगी बाणले। ते राहे तैसेची।।५८।। शब्द जरी एक। प्रांतोप्रांती ऊच्चार अनेक।। तैसे सहयज्ञीस। म्हणती सहयद ऊत्तर देशी।।५९।। धर्मांतरीत सहयद। ईस्लाम भाषे म्हणती सय्यद।। ऐसे सय्यद धर्मांतरीत। आले पंजाब प्रांती।।६०।। मुलतान ग्राम पंजाबात। आले सय्यद तेथ।। वास्तव्य करोनी राहात। ऊपासना हिंदू धर्मी।।६१।। तयांचे वंशात। पुण्यात्मा जन्म घेत।। कबिरोद्दीन नाम त्यास। सामर्थ्यवंत जन्मजात।।६२।। आरोग्य देत रोगीयांसी। धन देती दारीद्रयासी।। सेवाकरीती पंगुंची। करीती ज्ञानदान।।६३।। वयात येता कबिरोद्दीन। जाहले तयांचे लग्न।। त्यानंतर दोन। कामिनी त्यांनी पर्णील्या।।६४।। तयांपासोनी विस्तारला वंश। पुत्र जाहले बहूविध।। कबिरोद्दीन आनंदात। जीवन आपुले कंठीती।।६५।। तयांचे तृतीय पत्नीस। लागले दोहद।। तीयेचे स्वप्नांत। दीसती सालंकृत सुवासिनी।।६६।। कदा शुभ्र हंस। कमल धरोनी चोचीत।। तीच्या करी देव। जागृतीत अनुभवे कमलगंध।।६७।। तीने स्वप्ने सांगता पतीस। तया होतसे हर्ष।। म्हणती हे अघटीत। ऐसी स्वप्ने अगम्य।।६८।। कबिरोद्दीन विचार करीती। काय असेल स्वप्नगती।। परंतु तया निश्चिती। ऊमज कांही पडेना।।६९।। तया

होतसे ज्ञात। रैवत म्हणजे गिरनार पर्वत।। तेथ वास श्रीदत्त अवधुत। शिष्य तयांचा संस्कृती।।७०।। संस्कृतींचे करता स्मरण। व्हावे निद्राय मान।। तंव कोणी येऊन। स्वप्नी स्वप्नार्थ सांगती।।७१।। रैवते श्रीदत्त शिखरे, संस्कृति नाम वैद्वीजः। तस्य स्मरण मांत्रेण, स्वप्नार्थ संभव सप्तदीने।।७२।। अनुष्ठान होता सप्तदीन। स्वप्नीं आला ब्राह्मण।। अक्षमाला कमंडलू धारण। श्वेत वस्त्र परीधानीले।।७३।। सात्विक तेजस प्रभा। नितळ काया, अमुप शोभा।। सोलीव केळी कर्दळी गाभा। ऐसी कांति दीसतसे।।७४।। हरी चंदनाची भाळी ऊटी। वरी केशराची अर्धचंद्राकृती।। कस्तुरी तिलक भ्रुमध्यीं। कंठी कमलाक्ष माला।।७५।। सोनटक्क्याचें पुष्प। तैसे कोमल पदतल।। पदांवरी अष्टदल। कमल कुंकुमे रेखीले।।७६।। ब्राह्मण सांगे स्वप्नार्थ। तव तृतिय पत्नी गर्भात।। अखंड अविनाशी अमर ज्योत। देव कळा संचरली।।७७।। पुत्र होयील अवतारीक। ऊध्दरील तंव कुळास।। त्याचे दर्शन मात्रे। हरण दैन्य दुःखांचे।।७८।। जरी शैशव वय असत। वंदनीय सर्वत्र।। ईश्वर होयील अवतरीत। ग्लानी आली वैदीक धर्मा।।७९।। अधर्माचा करील नाश। रक्षील साधू-संतांस।। तयाचे संकल्प सिध्दीत। देवता क्षोभ मावळे।।८०।। ऐसे सांगुनी दैवी पुरुष। अंतर्धान पावे त्वरीत।। कबिरोद्दीन होवोनी जागृत। अचंभीत होतसे।।८१।। आपुल्या पत्नीस। स्वप्नार्थ निवेदीत।। तव भोगे समाधिसुख। आत्मानंदा प्रवर्तली।।८२।। चर्येवरी आनंद ओसंडीत। तेजे

मोहरले मुख।। स्वप्नींचा संकेत। मौनत्वें रक्षीला।।८३।। अवतार होण्या आधी। देवता पाहती भूशुध्दी।। पूर्व पुण्यवंती। अवलोकीती मातु स्थान।।८४।। तीये करवी करूनी अनुष्ठान। देह दोषां निवारण।। अवतारकाली अधिष्ठान। त्यजीती देहस्थ देवता।।८५।। पूर्व पुण्य असल्याविण। ऊदरी नोहे अवतरण।। श्रीगुरुकृपा पूर्वजन्मीं। आशिर्वचन पुत्रत्वाचे।।८६।। श्रीपाद दत्त आज्ञेसरी। अंबा शनि प्रदोष व्रत करी।। पुढील जन्मी तीचे ऊदरी। श्री नृसिंह सरस्वती अवतरले।।८७।। तेच आमुचे दैवत। म्हणूनी अत्यानंद होत।। पूर्वजन्मीं श्रीगुरु सकृप। करीती कृपा जन्मोजन्मी।।८८।। आणि विशेष आनंद। जेव्हां ईमामशाहा अवतार।। त्या समकालांत। गाणगापुरी होते श्रीगुरु।।८९।। दर्शन त्यांचें प्रत्यक्ष। कदा झाले असावे इमामशाहांस।। श्रीगुरुचरित्र अनंत। समस्त कोणा ज्ञात असे।।९०।। कबिरोद्दीन पत्नीचा पूर्व वृत्तांत। नसे संत समागमात।। परी श्रीगुरु कृपावंत। तये भंरवसे निवेदी।।९१।। नसावा संदेह मनांत। कीं हे मानवकृत।। जरी आला विकल्प। परी कोणी निंदू नयें।।९२।। अजमेर ग्राम राजस्थानांत। ब्राह्मण कुळीं जन्मत।। फूलाबाई नाम ख्यात। धार्मिक वृत्ती वर्ततसे।।९३।। तेथे सूफी संत। ख्वाजा गरीबे नवाझ ख्यात।। समस्त ज्ञाती वंदीत। नवस पूर्व तयांचें।।९४।। तेथे कदा दर्शनास। फूलाबाई जात।। झाला तीये दृष्टांत। जावे पुष्कर क्षेत्री।।९५।। वय तीयेचे सान। पुष्कर दूर जाण।। कैसे आज्ञापन। देतील माता पिता।।९६।।

जैसे विधीचे विधान। त्यापरी येतसे घडून।। पुष्कर क्षेत्रीचा विप्र येऊन। वर्णीले तियेसी।।९७।। ब्रह्मदेव मंदीर भारतात। केवळ पुष्करांत।। फूलाबाई पतीसहीत। दर्शना मंदीरी जातसे।।९८।। अनुष्ठानीती वेदमाता। दग्ध दुर्योग दुरीता।। पुरश्चरणे अनुष्ठानीता। झाली गायत्री प्रसन्न।।९९।। ब्रह्मा नारायण हरि। सदा नामस्मरण करी।। अष्टाक्षरीं स्मरणमंत्र अवधारी। श्रीगुरुकृपें लाभला।।१००।। अष्टाक्षरी मंत्रात। गायत्रीचा असे स्त्रोत।। प्रथम शब्दांत लुप्त एक अक्षर। नवाक्षरी मंत्र जाणा।।१०१।। मंत्र हा त्रिपाद। त्रिकाली जपण्या पात्र।। स्वयं बंधमुक्त। नसे विधी विधान।।१०२।। जन्म होता समाप्त। कबिरोद्दीन पत्नी होत।। ऐसी भूमिका शुध्द। तत्र अवतरतील ब्रह्मा।।१०३।। दीप्ती पावे कायेस। भरले नऊ मास, नऊ दीवस।। प्रसूतीचा वात। मंद मंद वर्ततसे।।१०४।। प्रसूतीच्या वेदना। झाल्या त्वरे क्षीण।। त्यजुनी आपुला गुण। राहती शांत।।१०५।। कबिरोद्दीन कांता देहात। अंशे ब्रह्मांड देवता स्थित।। आपुली स्थाने त्यजीत। देहपिंड रिक्त केला।।१०६।। शुभ लग्न, शुभ काली। देवता मंडळ अंतराळी।। सुगंधा ऊधळी गंध कुसरी। कल्प सुमा आला बहर।। सत्यलोका धडकती भेरी। नाद न माये नभोदरी।। सरस्वती वीणा झंकारी। ॐकार ध्वनी दुमदुमे।।१०८।। ऊमलतीं ब्रह्म कमळे। त्रैलोक्य गंधे परिमले।। आकाशी शब्द ऊमटले। अथ ऐसे जाणीजे।।१०९।। गौतमी गंगे कल्लोळ। फवारे आनंदे रस।। देवता अंगीचा मद।

आकळी धरेते ॥११०॥ घेऊनी कल्पसुमें अंजली। देवता आल्या नभोमंडळी। अष्टादश सिध्दी तिष्टती। येऊनी प्रसूतीगृहा ॥१११॥ डमरू नाद कैलासी। ॐकार नादे निनादी॥ ईच्छा क्रीया, ज्ञानशक्ती। प्रवर्तवी नारायण ॥११२॥ यशोमती माया मोहन। योगनिद्रा मातेस जाण॥ शुभ तिथी, योग करण। पातली अवतार वेळा ॥११३॥ मातेच्या ऊदरांत। ऊचित नाडया सिध्द॥ आणि पाहती वाट। स्वकार्याची ॥११४॥ शंखीनी नाळेतून। करी जीवदशा संचारण॥ सुषुम्ना नलीकेतून। दशप्राण वाहती ॥११५॥ ब्रह्मरंध्रातून चैतन्य। देही करी प्रवेशन॥ आणि भ्रुरंध्रातुन। दैवी कला प्रवेशली ॥११६॥ ब्रह्मयाचा अवतार। प्रकट झाला धरेवर॥ अज्ञात तम मातेस। केव्हां बालक जन्मले ॥११७॥ देवता करीती पुष्पवृष्टी। हरीतांग झाली सृष्टी॥ कली झाला कष्टी। त्रिलोकी आनंद प्रवर्तला ॥११८॥ ईस्लाम शक आठशें चव्वेचाळीस। सफर होता मास॥ तीथी होती सत्तावीस। चवदाशे चाळीस इसवी शक ॥११९॥ शुभ योग साधून। अवतरले शाहा इमाम॥ अवतार ब्रह्मा नारायण। जगदोध्दारा प्रवर्तले ॥१२०॥ इति श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृते॥ श्री इमामशाह प्रकटण नाम, तृतियोध्याय: ॥१२१॥

श्री गुरुदेवार्पणमस्तु॥ शुभं भवतु॥

# अध्याय ४ था

ॐ परमात्मने नमः।। श्री दत्तात्रेयाय नमः।। श्री सरस्वत्यै नमः।। श्री निष्कलंकी नारायणाय नमः।।१।। कबिरोद्दीनाचे नवजात। बालक होते शुचिष्मंत।। सर्व अवयव प्रमाणित। बालार्कवर्ण कांति असे।।२।। स्वर्ण-अरूणवर्ण मिश्रीत। तैसा चमके केशकलाप।। भाळ विशाल सुरेख। विलसे नेत्री निलीमा।।३।। निशीगंधाचे पुष्प। तैसे असे नासिक।। लोभ विलोमी अ कार। तैसे असती ओष्ट।।४।। पलाश पुष्प वर्ण। ओष्टी रेखीला अनुपम।। आकर्ण भुंवई जांभुळ वर्ण। धनुकृती विराजल्या।।५।। गोबरे सुरेख कपोल। वर्ण जैसे पक्व वटफल।। कर्ण सान मृदुल। जैसे अश्वत्थपत्र कोवळे।।६।। कंठ जैसे शिवशाळुंका। तयावरी पंच तीळ देखा।। सुदृढता स्कंधा। वक्षी अष्टमी चंद्रकला।।७।। तीन वळया दीसती। तयाच्या ऊदरा वरती।। नाभी असे शंखाकृती। सिंहासम कटी ऊकारमात्रा।। केळी कर्दली गाभा। तैसी अंकाची शोभा।। कुंजराचे गंडस्थल। जानुस वाटती।।९।। बाहू असती आजानु। नखे आरक्त वर्ण।। करतली स्वस्तिकादी चिन्ह। नक्षत्रादी कमल।।१०।। अंगुल्यांचे अग्री। चक्रचिन्हे शोभती।। पद दिसती कूर्मपृष्ठी। कार्पासासम मृदुल।।११।। पदांगुल्या अग्री चंद्राकृती। नखवर्ण मदयंती।। पदतला खालती। अष्टदली चक्र चिन्ह।।१२।। गाळूनी मदनार्क। निर्माण केला मूर्त।। नाम ठेविले अनामास। सय्यद अब्दुल रहीम।।१३।। मुलतानीचे जन। पहाण्या येती शिशु सान।।

माता पिता झाले धन्य। अगाध करणी ईश्वराची ।।१४।। इमामशाहांची जन्मवेळ।
ती असे अज्ञात।। परंतु एक सिध्दांत। सिध्द, अवतारांसी ।।१५।। ऊच्चस्थानी पंचग्रह।
संधीकाल शुभ वेळ।। जन्मकुंडली होयी केवळ। लग्नकुंडलीस कुंठीत मती ।।१६।।
हनुमान, परशुराम। नृसिंह, कृष्ण, राम।। श्रीदत्तात्रेय, वामन। संधीकाली अवतरती ।।१७।।
ज्ञात्यांचे ऐसे वचन। देवता विग्रह अवतरण।। होतसे चिदंबर क्षेत्रांतून। जेथ शिवमूर्ती
नटराज ।।१८।। कबिरोद्दीनाचे पुत्र। कुराण आचारधर्म प्रणीत।। नमाज रोजे राखीत।
भक्षीती गो मांस ।।१९।। गो मांस अती ऊष्ण। भक्षणें व्याधी निर्माण।। शिघ्र कोपी
परम। तमोवृत्ती जाणीजे ।।२०।। एकदां संस्कृति शिष्य। श्री दत्तात्रेया पुसत।। सृष्टी
असतां औषधीयुक्त। कैशाव्याधी निर्माण ।।२१।। तेव्हां वदती भगवान। असता एकदा
अवर्षण।। जने केले गोमांस भक्षण। ऊष्णते ऊद्‌भवे संग्रहीणी ।।२२।। त्या प्रथम
व्याधीतून। अनंत व्याधी निर्माण।। तयांचे मोचन। रसौषधी, मंत्रे होतसे ।।२३।। परंतु
अब्दुल रहीम। असे त्याचा धर्म अन्य।। वेदोक्त मार्ग आचरण। अष्टांगयोग साधितसे ।।२४।।
ॐकार स्मरण चिंतन। समाधिमाजी मग्न।। चैतन्य ज्योतीचे ध्यान। त्रिकाल स्नान
संध्या ।।२५।। श्रोते होती संदेहीत। ईस्लाम कैसा संध्या करीत।। त्याचे विवरण
येथ। यथामती देतसे ।।२६।। वेदोक्त आणि पुराणोक्त। ऐशा संध्या होत।। अनादी
संध्या वेदोक्त। द्वापारापासून पुराणोक्त आचार ।।२७।। वेदोक्त संध्या श्रृतीसंमत। स्मृतीमते

पुराणोक्त।। ब्राह्मणे वर्तावे वेदोक्त। ऐसे ऋषीवचन असे।।२८।। ब्राह्मण जे सांप्रत। पुराणोक्त संध्या आचरीत।। वैकल्यादी व्रते। आचारादी पुराणोक्त असती।।२९।। नित्य, नैमत्तिक कर्म। पुराण तया प्रमाण।। तयांचे धर्माचरण। जाणोत तेची।।३०।। रहीमचे अग्रज। तयाचा छळ करीत।। काफर धर्म आचरीत। नाठाळ जन्में इस्लाम वंशी।।३१।। रहीमाचे धर्माचारी। घरी अशांती अघोरी।। पाक सब्जा मूळी। विषवल्ली वर्धतसे।।३२।। रोजा, नमाज, मोहरम। पाक इद रमझान।। बिसमिल्ला निर्रहमान निर्रहीम। पाक मंत्र जपावा।।३३।। पाक धर्म ईस्लाम। याचा आचार मुर्खपण।। शरशब्दे विदारण। आप्त तया करीती।।३४।। पिता कबिरोद्दीन। जाणती वर्तमान।। परी मूर्खा सत्यज्ञान। न रुचे तयांसी।।३५।। मरणोन्मुख रुग्णास। न रूचती पथ्य।। तैसे मुर्ख जनांस। हीतवचने न रुचती।।३६।। आप्त होती संतप्त। तरी रहीम शांत।। कदा परांचे हीनत्व। ऋण म्हणुनी फेडू नये।।३७।। रहीमा वर्ष लागता आठ। पीता घाली पाठशाळेत।। परी तेथे अभ्यास। कदा न करी तो।।३८।। तेथे असती विद्यार्थी। निवारे त्यांची आपदा व्याधी।। केवळ स्पर्श मात्रेसी। इष्ट कामना पूर्त।।३९।। रहीम पाठशाळेत। गेला दिवस आठ।। जन्मतांच सिध्द। शिकणे न लगे तया।।४०।। पूर्व जन्मीचें तपमात्रे। जन्मसिध्द ये जन्माते।। अष्टादश सिध्दी तयाते। ऊपजे प्रसन्न ऊपजताच।।४१।। रहीम पित्या समवेत। फिरत असतां ग्रामात।। तंव कोणी स्त्री येऊनी सन्मुख। वंदी कबिरोद्दीना।।४२।। वंदे मी मुलतानवासी। केशर नाम देहासी।।

असे क्षत्रिय ज्ञातीसी। एक पुत्र मज असे ॥४३॥ धनु नाम यास। जन्मत: यासी अंधत्व॥ प्रबल मज दु:ख। असता सर्व सौख्ये ॥४॥ तीये सांगती कबिरोद्दीन। जन्मांधा नसे रसायन॥ करीं तयाचे पालन। जाण हेची कर्तव्य ॥४५॥ केशर करी विलाप। म्हणें आपण पुण्य पुरुष॥ काय तुम्हां अशक्य। असे या जगती ॥४६॥ दु:खी स्त्रीये पाहून। गहींवरला रहीम॥ म्हणें दु:ख सावरून। सांगतो ते ऐक ॥४७॥ पूर्व जन्मींचे पाप-पुण्य। तैसे कर्मफल जाण॥ संचिती त्याचे जतन। भोगणे इह जन्मी प्रारब्धे ॥४८॥ .प्रारब्धाची ऐसी स्थिती। भोगणे कर्मगती॥ विधी लेख ललाटी। तैसे घडून येतसे ॥४९॥ जीवदशा ऐसी असते। भोगणें ईश्वर ईच्छेपरते॥ जीव वर्ते परतंत्रे। सूत्र बंधन बाहूलीसी ॥५०॥ जैसे केले तैसे भोगणे। पेरले ते भक्षीणे॥ जरी घडे अज्ञपणे। तरी नसे क्षमा ॥५१॥ स्त्री वदे रहीम। हे कोणाचे कर्म॥ पुत्रास अंधपण। जीवंतपणी मरण साहे ॥५२॥ तंव बोले रहीम। जयाचे कर्म तया कारण॥ परकर्माचा लेप। न लागे इतरा ॥५३॥ सूर्यचंद्राचा कोप। म्हणूनी यासी अंधत्व॥ पूर्व जन्मीं दिले परादु:ख। चक्रवाढ व्याजे तुज भोग ॥५४॥ आपुला भोग आपणासी। असे अग्राहय परासी॥ वढीत जे ललाटासी। कैसे घटीत होयील ॥५५॥ केशर म्हणे तव वय सान। अलौकिक असे ज्ञान॥ मनी वसे एक प्रश्न। उत्तर त्याचे निवेदिणे ॥५६॥ दयाळु, कृपाळू, क्षमावंत। करणे भक्त रक्षणास॥ विसंबत

नाहीं भक्तांस। ऐसे ब्रीद ईश्वराचे ।।५७।। सोडूनी आपुले ब्रिदास। वर्तणे शोभे काय
त्यास।। कैक केले नवस सायास। काल जाण वृथा गेला ।।५८।। अस्थींचा पुतळा।
मांस रक्ते लींपीला।। पांघरला चर्म खोळा। ऊपमा तया चंद्र कमलाची ।।५९।।
तैसी वृथा विशेषणे। लाविली ईश्वरा कारणे।। ज्ञात्यांची वचने। कैशी असत्य
मानावी ।।६०।। सत्य म्हणावी तरी अनुभव शुन्य। असत्य म्हणतां पाप जाण।।
खरे वा खोटेपण। दोन्हींही भ्रम वाटे ।।६१।। रहीम म्हणती ज्ञानवंते। सत्य जाण
ईश्वराते।। दृढ श्रध्दे तूवे। अनुभव निश्चित ।।६२।। जैसा भाव तैसा देव। जना
येत अनुभव।। सुई अग्रमात्र जरी संदेह। तरी फल नसे ।।६३।। परीसाचे स्पर्शे करून।
लोहाचे होत सुवर्ण।। परी लोहा लागे शुध्दपण। केसाग्रमान नसावी मलीनता ।।६४।।
जेथे जैसी भावना होत। तैसे कार्य सिध्द।। नको संदेह अणुमात्र। भावनेसी पाव
सिध्दी ।।६५।। मंत्र, तीर्थ, देव, ब्राह्मण। वैद्य, श्रीगुरु आणि दैवज्ञ।। सातांठायी
जैसी भावना। तैसी होय कार्यसिध्दी ।।६६।। तरी ऐक शुध्दमते। विश्वास ठेवि महासिध्द
वचनाते।। शुध्द मनें अर्चि ईश्वराते। तो दयार्द असे निश्चित ।।६७।। तरी प्रात:काली
ऊदयीक। बालका दृष्टी तेज युक्त।। ईश्वर कृपें तेज चंद्रार्क। नेत्री निश्चित विराजेल ।।६८।।
वंदुनी रहीमास। स्त्री गेली स्वगृहास।। रहीम वचा ठेऊनी विश्वास। आराधीत परमेशा ।।६९।।
रात्रीचा प्रत्येक क्षण। वाटे तीज युगासमान।। शतगुणे वाटे निशामान। वाट पाहे

प्रभातीची ।।७०।। उत्कट प्राप्त घटीक्षण। तव काल वाटे दीर्घमान।। त्याक्षणा एकाग्र मन। अनुभव असे समस्ता ।।७१।। धरा आकळे प्रभात। घन तम वितळत।। गगना गुलाल ऊधळीत। प्रवर्ते अरुण ।।७२।। सूर्याचा पडता कीरण। धरा झाली प्रकाशमान।। बालक ऊघडीता नयन। वीरे नेत्रीची कृष्णछाया ।।७३।। धुम्रवर्ण सुभट। बालक दृष्टीस येत।। तीही जेव्हां वीरत। तंव नेत्र कमले ऊमलली ।।७४।। हर्षे बालक वदे मातेस। दृष्टी पाहे सृष्टीस।। आनंदुनी घेऊन बाळास। आली माता रहीम गृही ।।७५।। म्हणे तु बालक नच ईश्वर। प्रारब्ध माझें दुस्तर।। तुमची कृपा अपार। पाहे सुवर्णदीन ।।७६।। तु नाथ अनाथा। प्रारब्ध दोष निवारीता।। ईश्वर साक्ष तंव शब्दा। म्हणून सिध्दी पावले ।।७७।। दीनांचा कैवारी। अवतरलास भुंवरी।। तव इच्छे दुर्योग सरी। येती सुयोग होऊन ।।७८।। केवळ तव संकल्पे। आमुचे प्रारब्ध टळे।। जो चिंतामणी आकळे। तया कैसी चिंता ।।७९।। मानव नाहीं तु ईश्वर। ऐसे माझे वदे अंतर।। साक्षात तु शुभंकर। आम्हां लाभे अभय ।।८०।। तुमची कृपा आम्हांप्रत। राहो देवा अखंड।। आमुचे प्रारब्ध मंद। सुलक्षणी तव कृपे ।।८१।। जे नसे स्वप्नांत। तेच होयी प्रत्यक्ष।। साक्षात तु अविनाश। भुवरीं अवतरलासी ।।८२।। तीये बोधती रहीम। सदा करी ईश्वर स्मरण।। तोच सर्वदा रक्षण। करील तुमचे ।।८३।। इति श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृते।। जन्मांधा दृष्टी प्रदान नाम चतुर्थोध्याय: ।।८४।।

श्री गुरुदेवार्पणमस्तु।। शुभं भवतु।।

# अध्याय ५ वा

ॐ परमात्मने नमः।। श्री दत्तात्रेयाय नमः।। श्री सरस्वत्यै नमः।। श्री निष्कलंकी नारायणाय नमः।।१।। कल्याणाद् भुतमात्राय। वांछीतार्थ प्रदायिने।। नमो श्री अवधुताय। श्रीपादाय ते नमः।।२।। पुढील कथा विस्तारासी। द्यावे अवधान परीयेसी।। मंत्रगर्भ शब्दांसी। निर्मिणे तुवां।।३।। हाती आला चिंतामणी। पूर्व पुण्य म्हणूनी।। रहीमांस वंदुनी। गेली केशर स्वगृहा।।४।। अवतारीक सिध्दांची होण्या भेट। असावे पुण्य संचितात।। योग असतां सिध्द। तरच होते दर्शन।।५।। पूर्वजन्मीं पुजीता सिध्द। पुण्यसंचय संचितात।। कारणाविना कार्य। न होय सर्वथा।।६।। वेश्येने केले ऋषभदेव पूजन। पुढील जन्मीं त्यांचे दर्शन।। तीचा पुत्र केला संजिवन। झाले व्याधीमुक्त माता पुत्र।।७।। संत महंतांचे अर्चन। कदा वृथा नोहे जाण।। तयाचे शुभ फल प्रदान। ईश्वर करीतसे।।८।। संत महंतांची सेवा। ती जाई ईश्वर ठावा।। ईश्वर सर्वत्र मानावा। भूतमात्रादी करोनी।।९।। जन्मांधासी लाभले नेत्र। मुलतान वासियां होयी ज्ञात।। इमाम म्हणुनी रहीमास। सर्वत्रे आदरीले।।१०।। आधी व्याधी पिडीस्थ। पंगु बधीर अधनगत।। येऊनी इमाम पदाप्रत। कार्यार्थ आपुला साधिती।।११।। शापानुग्रह सामर्थ्य। असे इमामा जन्मजात।। कृपेश होती त्वरीत। पात्रापात्र पाहूनी।।१२।। मुलतान

ग्रामी वाणिक। अपार धन संपदा।। सर्व सौख्ये तया घरा। तिष्ठून राहती।।१३।।
सर्व सौख्यांचे सुख। दु:ख वाटे तयास।। एक पुत्र बधीर मुक। असे वाणिका।।१४।।
सौख्ये असता तिष्टत। जरी असे अल्प दु:ख।। अल्प दु:खातून वजा होत। सर्व
सुखे सर्वदा।।१५।। राजा दशरथ सार्वभौम। नसे तया संतान।। एकच या दु:खांतुन।
वजा होती समस्त सौख्ये।।१६।। वाणिक नाम विरचंद। रेवणदास तयाचा पुत्र।।
सत्वगुणें वर्तत। परी असहच दु:ख।।१७।। इमामांची कीर्ती। आली विरचंदाचे श्रुती।।
रेवणदासा घेऊन संगती। आला इमाम दर्शना।।१८।। विनयें वंदुनी वदत। बाल
रुप परी सिध्द।। व्हावे आम्हां कृपावंत। ऊध्दारावे आम्हांसी।।१९।। आपुला महीमा
अगाध। दैवी शक्तीचा स्त्रोत।। आपुल्या कृपेचा मेघ। वर्षो आम्हांवरती।।२०।। रेवणदास
माझा पुत्र। जन्मतांच बधीर मुक।। उपाय केले अमूप। तरी उपाय होयीना।।२१।।
केले देवता अर्चनास। नवस आणि सायास।। शरण साधु महंतांस। तरी अभाग्य
निवटेना।।२२।। भाग्य नसतां ललाटी। पाऊस पडे शेताच्या काठी।। ऐसी आमुची
स्थिती। जाहलीसे बालसिध्दा।।२३।। व्हाल आपण दयावंत। ऐसी मनोदेवता सांगत।।
तरी होऊनी रुष्ट। कष्ट आमुचें निवारावे।।२४।। इमाम पर्दी लागे रेवणदास। व्याकुळ
दृष्टे पहात।। तया अंतरीचे शब्द। वैखरी न ऊमटवी।।२५।। बोलतसे मौन भावा।
दया करी देवा।। तुजविणें अन्य ठावा। परतवु आम्हां नये।।२६।। मस्तक ठेवि

इमामचरणी। ओघळती अश्रु नेत्रांतुनी।। तयांची श्रध्दा पाहूनी। दया ऊपजे अंत:करणी।।२७।। इमाम तया म्हणती ऐक। तुज सांगतो मार्ग एक।। तुझे कार्य होयील सिध्द। लक्ष्मीरमण गुरुप्रसादे।।२८।। रेवणदासा तुज उपदेशीन। रोग आपदा नाशक महान।। सौख्यदाता, विघ्न विनाशन। संपत्तीदायक मंत्र असे।।२९।। तयाचा होता जप। जातील त्रिताप।। जन्मांतरीची महत्पापे। हरतील त्यान्वयें।।३०।। मानव दुरीत नाशाकारण। आदीपुरुष श्रीनारायण।। तयांचे मूळ स्फुरणांतून। मंत्र प्रकटला।।३१।। नाम नारायण गायत्री। देवता श्री निष्कलंकी।। नारायण देवता अधिष्ठाती। आयुध भस्म।।३२।। भस्म महीमा अगाध। आदरे तया सदाशिव।। भस्मा संगती मंत्रास। अपूर्व येत तेज।।३३।। तुलस, बेल, चंदन। दुर्वा आणि भस्म।। शमी कर्पूर जाण। सात जाणा शुध्द अती।।३४।। अंतीचे संस्कारा अंती। देह भस्म तीन चिमुटी।। विश्वनाथ चर्ची ललाटी। त्रिपुंड भस्माचा।।३५।। रेवणदासा श्री इमाम। भाळी लाविती भस्म।। आणि दक्षीण कर्णरंध्रांतून। प्रवर्तवीती नारायण गायत्री।।३६।। श्रीगुरुपदां वंदुन। जपी रेवणदास मंत्र मनोमन।। परेचे स्फुरण। साकार पश्यंतीत।।३७।। मध्यमेत येता मंत्र। स्पंद शब्दोच्चार अव्यक्त।। तो येता वैखरीत। शब्द ब्रह्म प्रकटले।।३८।। प्रेरीला मंत्र कर्णांत। शुध्दता गोल्हाटास।। गेले त्वरीत बधीरत्व। ब्रह्मावतार संकल्पे।।३९।। ऐसे अवलोकीता। विरचंद झाले हर्षवंत।। श्रीगुरूपदा वंदीत। महादु:ख निवटीले म्हणूनी।।४०।।

तुम्हीं साक्षात श्रीहरी। अवतरलात भूवरी।। भक्तांचा कैवारी। अससी निश्चित।।४१।। केशरचा अंधपुत्र। तया दान केले नेत्र।। गेले मुक बधिरत्व। आमुच्या पुत्राचे।।४२।। नर म्हणतील तुम्हांस। जातील निश्चयें नरकास।। तव पद सर्वदा अविनाश। झालो रत तवपदी।।४३।। श्रीगुरु ईच्छे करून। विरचंदे केले वस्त्रान्न दान।। हर्षा न मावे गगन। अत्योल्हासीत झालासे।।४४।। श्रीगुरु कृपेसरी। आनंदे वर्ते गृही।। श्री नारायण गायत्री अवधारी। अमाप लाभे संपदा।।४५।। मात गेली ग्रामांत। ग्रामस्थ कोणी हाजरबेग।। येऊन वंदी इमामास। त्यांचे चरणी लागला।।४६।। म्हणे ऐका एक विनंती। सदा राहीन आपुले संगती।। झाली चिंतामणीची भेटी। तुच्छ वाटे जगत।।४७।। शेष जे आयुष्य। वेचीन आपुलें चरणास।। मानव जन्माचे सार्थक। व्हावे आपुल्या कृपे।।४८।। करी मज अनुग्रहास। होयीन आपुला शिष्य।। जोवरीं आपुला वास। राहीन छाये समान।।४९।। पापे जाती गंगास्नाने। हरे ताप चंद्रदर्शने।। कल्पवृक्ष महीमानें। कल्पीले पावीजे।।५०।। चिंतामणीचे संगती। चिंता सर्व नष्ट होती।। पाप, ताप, दैन्य दुर्गती। श्रीगुरुदर्शने हरतसे।।५१।। तया वदती इमाम। बुध्दीदाता नारायण।। त्यांचे सिध्द संकल्पन। त्या परी घडतसे।।५२।। जैसी तुझी मती। घडेल त्यापरी कृती।। केला अनुग्रह तयाप्रती। होते पूर्वपुण्य गाठी।।५३।। शिष्य केला हाजरबेगास। इमामा आले गुरुत्व।। या पासून या ग्रंथात। इमाम श्रीगुरु जाणावे।।५४।। उपदेशिता

तो श्रीगुरु। हाची जाणा निर्धारु।। जन्मोजन्मी न विसरे। आपुल्या शिष्यासी।।५५।।
श्रीगुरु लाभता एकदा। तोची भेटे जन्मोजन्मी सर्वदा।। या अर्थे श्रीगुरु भेटे आपैसा।
वदती श्री ज्ञानेश।।५६।। मात पसरे मुलतानांती। जन येती श्रीगुरु दर्शनासी।। ग्रामी
वसती कुबुध्दी। बोलती बुध्दीन्वयें।।५७।। कुबुध्दी तामस। अधिक जन कलीत।।
करणे वर्म भेद। पिशाच्चानंदी ऊल्हासी।।५८।। वर्मभेदाहून। शिरच्छेद ऊत्तम।। वर्मभेदावून।
मरण उद्भवे कैकवेळा।।५९।। येता परा विघ्न। संतोषि त्यांचे मन।। होता ऐशांचे
दर्शन। सवस्त्र स्नान करावे।।६०।। कुबुध्दी मुलतानवासी। जे न घडे कबिरासी।।
तयाचा पुत्र सहजेसी। दावी विलक्षणता।।६१।। कबिरोद्दीना पीर म्हणती। परी नसे
सिध्द शक्ती।। काळी विद्या तया प्रती। ती ही नसे।।६२।। त्याच्या सर्व पुत्रांत।
रहीम तत्वनिष्ठ।। तयाच्या ईच्छेस। अतर्क्य येतसे घडून।।६३।। कबिरोद्दीना लांछन।
पुत्रासी सिध्द साधन।। पित्याने वंदन। आता करावे पुत्रासी।।६४।। जे असती सात्विक।
देवकळा कबिर पुत्रात।। त्याचे कृपेस व्हावे पात्र। लाभेल ईष्टता।।६५।। जयासी
म्हणती दुर्गती। तया दृष्टी होत सुगती।। त्याचे नाम स्मरण मात्रे। भवपार होयील।।६६।।
जन्मता तयासी गुरुत्त्व। झाले प्राप्त निश्चित।। सिध्द त्याचा संकल्प। निधान लाभ
कबिरासी।।६७।। वाटे जगदोध्दारा। ईश्वर अवतरे भूतळा।। मूळच्या शक्तीकला।
विग्रहा सवे येती।।६८।। अवतार होण्या आधी। शक्ती कला अवतरती।। तनु असे

गोमटी भंवती असे दैवी तेज ।।६९।। जे असे ब्रह्मांडी। तेच असे पिंडी।। ऐसी सत्य ऊक्ती। ज्ञानियांची असे ।।७०।। मानवाचे देही। वसतो मेदमांसी सिध्दी शक्ती।। योगाचे सिध्दांती। प्रकट होती अभ्यास यत्ने ।।७१।। शक्ती वर्धीती नित्य। अयाहून व्यय आणिक।। अती श्रवण अती वक्तव्ये। होतसे लय त्यांचा ।।७२।। जर होणे शक्ती वर्धन। अत्वार्थ भाषणी धरी मौन।। अनुचित श्रवण। वर्जावे सर्वदा ।।७३।। अधिक काली बहूत। असावें अंतर्मुख।। विचारांचे वावटळ। रोधणे सर्वथा ।।७४।। नामस्मरणीं असावें रत। चित्तवृत्ती निरोधीत।। योग म्हणजे चित्तवृत्ती निरोध। वदले पातंजली ।।७५।। शेषदेवाचा अवतार। पातंजली मुनीवर।। तोची जाणीजे भूंवर। ब्रह्मांड कुंडलीनी ।।७६।। जेव्हां देवता-सिध्द अवरतीत। सिध्दी शक्ती देहाबाहेर होत।। म्हणून त्यांचे संकल्पमात्रे त्वरीत। कार्य त्यांचे साधतसे ।।७७।। कुबुध्दीयांचे वाक्‌बाण। घायाळ कबिरोद्दीन।। परंतु त्यांचे मन। शांतचित्त असे ।।७८।। मुर्खांचे वचन। करावे दुर्लक्षण।। त्यांचे वचनी होता मग्न। तमोगुण वर्धतसे ।।७९।। येता त्यांचे संपर्कात। लेपे दोष संसर्ग।। आपुली बुध्दी भ्रष्ट। तया संगती होतसे ।।८०।। आपुली साक्ष आपणास। सरलता असे दृष्टीस।। वक्र भुंवयी संगतीत। दृष्टी वक्र होतसे ।।८१।। म्हणुनी श्रोते याकारणी। असावे हीना वर्जूनी।। सात्विकता वर्धवुनी। ईश्वरस्मरणीं रत असावे ।।८२।।

इति श्री ब्रह्मावतार, श्री इमामशाह ज्ञानामृते।। वाणिक पुत्र मुक बधिरत्व हरणं, तथा नारायण गायत्री प्रकटणो नाम पंचमोध्याय: ।।८३।।

श्री गुरुदेवार्पणमस्तु।। शुभं भवतु।।

# अध्याय ६ वा

ॐ परमात्मने नमः।। श्री दत्तात्रेयाय नमः।। श्री सरस्वत्यै नमः।। श्री निष्कलंकी
नारायणाय नमः।।१।। गुरुणां श्रीगुरु। भगवान श्रीदत्तात्रेय निर्धारु।। साक्षात श्री परमेश्वरु।
अवतरे भुंवरी।।२।। वदन सुवर्णवर्ण हेमांग। अंगी चंदनगंध।। षड्भुजी आयुध। पृष्टी
कामधेनू।।३।। चंदनी खडावा पदी। औदुंबर छाये शांत स्थिती।। रुप तयांचें ज्ञानार्थी।
कथीती तैसे वदेन।।४।। ब्रह्मा, विष्णू, महेश। त्रय शक्ती एकवटीत।। ईच्छा, क्रीया,
ज्ञान। शक्ती त्रय जाणीजे।।५।। औदुंबर कल्पवृक्ष। पाठी धेनू धरा प्रतिक।। नजिक
पदीं विराजीत। वेद चारी श्वान रुपे।।६।। करी रूद्राक्ष माळ। बीज मंत्रांचे सामर्थ्य।।
तीन शूल एकत्र। विजय, धर्म, अर्थ कामासी।।७।। वेदशास्त्रीं प्रभूत्व। प्रतिक डमरु।।८।।
कमल म्हणजें सत्वगुण। कृपा जल कमंडलू पूर्ण।। शंख चक्र तेची धर्म। वरदहस्त
सदा असे।।९।। ब्रह्मा नारायण हरि। हृदयी मंत्र अवधारी।। ब्रह्मरसा स्त्रवित सरी।
विचरी ज्ञानपंथ।।१०।। प्रार्थना समयीं घृतदीप। त्रिकाल प्रज्वलित।। दिसती असंख्य
दीप। प्रकाश स्त्रोत विखरे।।११।। श्रीगुरुंस पुसती जन। अगणित दीप लावी कोण।।
श्रीगुरु वदती भगवान। दीपोत्सव करीती।।१२।। तेजाची आरती। ब्रह्मांड देवता करीती।।
विघ्न कल्लोळा शांति। त्यान्वयें होतसे।।१३।। प्रत्यक्ष दिसे दैवत। अग्नी, चंद्र,

आदीत्य।। लक्ष चौऱ्यांशी योनीस। संजीवन देतसे।।१४।। चंद्र वसे मनांत। प्रकाशे नेत्री सूर्य।।१५।। सूर्याचें सूक्ष्मरुप। जाणावी घृत ज्योत।। प्रज्वाळुनी त्रिकाल। मंत्रे ध्यान करावे।।१६।। गायत्री छंद देव सविता। संधीकाला मंत्रे स्तविता।। ध्यानी मित्र बिंबा। अवलोकी सूक्ष्म नेत्रे।।१७।। नव्हते जेव्हां मही गगन। सूर्य चद्र तारांगण।। तेव्हां ब्रह्ममयता व्यापून। ज्योती कला एक होती।।१८।। त्या ज्योतीच्या प्रकाशात। ब्रह्मा सृजी सृष्टीस।। तीचे अंशरुप आदीत्य। दीप ज्योत अंशवेध त्याचा।।१९।। अंश वेधाप्रती। पूर्णाची होत प्राप्ती।। नेत्र वेधिता चित्ती। आदीत्य प्राप्ती होतसे।।२०।। जन पुसती श्रीगुरुसी। हे कोण बोलले तुजसी।। पूर्व जन्म संस्कारासी। श्रीगुरु वदती ज्ञात झाले।।२१।। पूर्व जन्मीची कथा। करीतसे विस्तारीता।। जंबुद्वीप पश्चिम भागा। मक्का मदीना असे ईस्लाम क्षेत्र।।२२।। शब्दां अपभ्रंश कालकारणी। मूळ नाम मख मेदीनी।। धर्मांधांचे उच्चारणी। म्हणती मक्का मदीना।।२३।। त्या काली विप्रवंशात। माझा जन्म होत।। एका सूर्य मंदीरात। होतो मी सेवक।।२४।। त्रिकाल स्नान संध्या वेदोक्त। आराधीत आदीत्य।। सविता देवते पुरश्चरीत। प्रसन्न होण्या वेदमाता।।२५।। त्रिकाली घृतदीप। देवते ऊजळीत।। मग्न ध्यानी ज्योत। हृदयस्थ सूर्या प्रकाशची।।२६।। येतां मास कार्तिक। करीतसे दीपोत्सव।। आसमांत प्रकाश। पसरे आदीत्य कृपे।।२७।। अनंत आदीत्य प्रकाश। जैसी तेवते दीपमाळ।। दीपांची

